सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता वनमहोत्सव (२४०६८५५१) लेखाशीर्षां-तर्गत पुरवणी मागणीद्वारे प्राप्त अनुदान वितरण करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पुरक-२०१८/प्र.क्र. ९८ /फ-११**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**दिनांक : १० जानेवारी २०१९.**

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८.

२) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक सावनि-२०१८/प्र.क्र.८८/ फ-११, दि. ६ जून २०१८

३) अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्रमांक कक्ष -१/पी/यो/चाबाप्र/ प्र.क्र. ४९/(SFD)/१६१८/२०१८-१९, दि. १२.१२.२०१८ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

दिनांक ५ जून ते ३१ ऑगस्ट हा काळ वन महोत्सवाचा काळ म्हणून दरवर्षी साजरा केला जातो. या कालावधीत वनीकरणासाठी लोकांना वृक्ष लागवडीसाठी उद्युक्त करण्याच्या दृष्टीने शासनामार्फत सवलतीच्या दराने रोपांचा पुरवठा करण्यात येत असतो. त्यासाठी रोपे निर्मितीची प्रकिया निरंतर चालू असते.

२. सदर योजनेसाठी **मागणी क्र. सी-०७-२४०६, वनीकरण व वन्यजीवन (११)(३४) वनमहोत्सव (२४०६ ८५५१) या लेखाशिर्षातर्गत माहे** मार्च २०१८ च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनात **सन २०१८-१९ करिता रु.४५००.०० लक्ष निधी** अर्थसंकल्पित करण्यात आलेला असून वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकानुसार निधीच्या ७०%. रक्कम रु. ३१५०.०० लक्ष निधी संदर्भ क्र. २ येथील दि. ६.६.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आला आहे. सन २०१९ मधील ३३ कोटी वृक्षलागवडीकरिता मोठया प्रमाणावर रोपे निर्मिती करण्याकरिता रु. ६४५०.०० लक्ष निधी जुलै २०१८ च्या पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक, ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भीय पत्र क्रमांक ३ अन्वये मूळ अर्थसंकल्पीय रकमेपैकी शिल्लक रु. १३५०.०० लक्ष व जुलै २०१८ मध्ये पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित रु.६४५०.०० लक्ष असे एकूण रु. ७८००.०० लक्ष निधी वितरित करण्याची विनंती केली आहे. त्यानुषंगाने नियोजन व वित्त विभागाने जुलै २०१८ मध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर निधीच्या ७० % म्हणजेच रु.४५१५.०० लक्ष निधी वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. सदर निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार सामाजिक वनीकरण विभागांमार्फत राबविण्यात येणाऱ्या **"वनमहोत्सव (२४०६ ८५५१)"** हया योजनेकरिता सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात जुलै २०१८ च्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु. ६४५०.०० लक्ष रकमेच्या ७० टक्केच्या मर्यादेत म्हणजेच रु.४५१५.०० लक्ष निधी वितरित करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता

घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

३. सदर निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

४. सदर निधी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भीय पत्र क्रमांक ३ अन्वये उपस्थित केलेल्या त्रुटींची पूर्तता प्रधान मुख्य वनसरंक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य,पुणे यांचेकडून करण्यात येईल या अटीच्या अधीन वितरित करण्यात येत आहे.

५. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर आणि प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत व्हावे.

६. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून वित्त विभागाच्या संदर्भिय दिनाक ०२.०४.२०१८ परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.८ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या पूर्ततेच्या अधिन राहून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. सी-०७**

**२४०६, वनीकरण व वन्यजीवन ,(०१)वनीकरण**

**(११)(३४) वनमहोत्सव (२४०६ ८५५१)५०- इतर खर्च**

७. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १९६/१४७५, दि. ५.०१.२०१९ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३६९/व्यय १०, दि. ८.०१.२०१९ अन्वये दिलेल्या मंजूरीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०११०१७५७२३२२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIRENDRA
RAMBAHAL TIWARI

Digitally signed by VIRENDRA RAMBAHAL TIWARI
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a
646a64986631086810, postalCode=400032, street=R AND F D,4TH
FLOOR,MANTRALAYA,MUMBAI, ou=FOREST DEPARTMENT,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VIRENDRA RAMBAHAL
TIWARI
Date: 2019.01.10 18:06:09 +05'30'

(वीरेन्द्र तिवारी)
**अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य,नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) (११ वृत्त)
५. वनसरंक्षक , सामाजिक वनीकरण (६ वृत्त)

६. विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण ( सर्व जिल्हे)
७. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
१०. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
११. वित्त विभाग, व्यय-१०, अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. निवडनस्ती/फ-११.